**बाराव्या पंचवार्षिक योजनेंतर्गत रोजगार हमी योजनेशी निगडीत फळझाड लागवडीव्दारे फळविकासाची योजना सन २०१५-२०१६ मध्ये चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. रोहयो २०१५ / प्र.क्र.११९/९-अे**
दालन क्र.५४३, ५ वा मजला, विस्तारित
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
तारीख: २० ऑगस्ट, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. रोहयो २००५/प्र.क्र.१ /९-अे, दि. २७ जून, २००५
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, रोहयो २०१०/प्र.क्र.६०/ ९-अे, दि. ०१ सप्टेंबर, २०१०.
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, रोहयो २०१३/प्र.क्र. २१/ ९-अे, दि. ०२ जून,२०१४
४) कृषि आयुक्तालय (फलोत्पादन), यांचे पत्र क्र. फलो-२/रोहयो/प्रस्ताव/२०१५- १६/ १८४५/२०१५ दि.१७ जून, २०१५

प्रस्तावना :-

महाराष्ट्रातील कृषि हवामान, शेतीविषयी पर्यावरण संबंधीचे प्रश्न, ग्रामीण भागात रोजगार निर्मिती व उच्च मुल्यांकित पिक रचना या सर्व गोष्टींचा विचार केल्यास फळवृक्ष लागवडीस महाराष्ट्रात भरपूर वाव आहे हे लक्षात घेऊन शेतक-यांची आर्थिक प्रगती घडविणे व पडीक जमिनीचा विकास या हेतूने रोजगार हमी योजनेशी निगडीत फळझाड लागवड कार्यक्रम राज्यात सन १९९० पासून राबविण्यात येत आहे. सन २०१५- २०१६ मध्ये सदर कार्यक्रम पुढे सुरु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

बाराव्या पंचवार्षिक योजनेंतर्गत रोजगार हमी योजनेशी निगडीत फळझाड लागवडीव्दारे फळविकासाची योजना सन २०१५-२०१६ मध्ये पुढे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**१. उद्दीष्टये :-**

सन २०१५- २०१६ या वर्षी हा कार्यक्रम ७००० (सात हजार) हेक्टर क्षेत्रावर राबविण्याचे उद्दिष्ट आहे. सदर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आवश्यक असलेली कलमे /रोपे शासकीय रोपवाटिका, कृषि विद्यापीठ रोपवाटिका, शेती महामंडळ, कृषि विज्ञान केंद्र व राज्यातील खाजगी नोंदणीकृत रोपवाटिका यांच्याकडून उपलब्ध करुन घ्यावयाची आहेत. सन २०१५-२०१६ मध्ये फळपीकनिहाय उपलब्ध होणारी

कलमे/ रोपांचे नियोजन व त्यांचे वितरण याबाबत सविस्तर सूचना संचालक, (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय हे सर्व संबंधीतांना निर्गमित करतील.

**२. जिल्हानिहाय लागवडीचे उद्दिष्ट :-**

सन २०१५-२०१६ या वर्षासाठी जिल्हानिहाय व फळपीकनिहाय उद्दिष्टे निश्चित करण्यासाठी संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय,पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३. कार्यक्रमांतर्गत लावावयाची फळझाडे :-**

या योजनेंतर्गत खालील फळझाडांची लागवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. **सलग लागवड :-**

**अ)** कोरडवाहू पिके :- १) आंबा, २) काजू, ३) बोर, ४) सिताफळ, ५) आवळा, ६) चिंच, ७) फणस, ८) कोकम, ९) जांभूळ, १०) कवठ, ११) चारोळी, १२) जोजोबा, १३) बांबू ,

**ब)** बागायती पिके :- १४) नारळ, १५) संत्रा, १६) मोसंबी, १७) चिकू, १८) डाळिंब,१९) पेरु, २०) अंजीर, २१) कागदी लिंबू, २२) सुपारी ( सलग पिक ), २३) तेलताड, २४) रबर.

२. **नारळ बागेत आंतर पिके :-**

**अ)** मसाला पिके :- १) मिरी, २) लवंग, ३) जायफळ, ४) दालचिनी.

**ब)** ५) सुपारी

३. **अ) बांधावरील लागवड :-**

बांबू

**ब)** भात खाचराचे बांधावरील लागवड :- १) आंबा, २) काजू, ३) पेरु, ४) नारळ, ५) आवळा

४. **औषधी व सुगंधी वनस्पती** :-

१) आइरन, २) अर्जुना, ३) असन, ४) अशोका, ५) बेल, ६) गुग्गुळ, ७) लोध्रा, ८) रक्तचंदन, ९) शिवण, १०) टेटू, ११) बेहडा, १२) बिब्बा, १३) डिकेमाली, १४) हिरडा, १५) रिठा, १६) वावडिंग, १७) करंज, १८) पानपिंपरी.

कोकण विभागामध्ये आंब्याच्या हापूस जातीची सलग लागवड करतांना २० टक्के आंब्याच्या इतर जातीची लागवड करणे आवश्यक राहील. (उदा. केशर, रत्ना, पायरी, सिंधु, गोवामानखुर, राजापूरी )

**४. क्षेत्रमर्यादा:-**

ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्हयातील सर्व तालुके आणि पश्चिम घाट क्षेत्रातील खालील तालुक्यांमध्ये लागवडीची प्रती लाभार्थी कमीत कमी क्षेत्रमर्यादा ०.१० हेक्टर राहील.

| अ.क्र | जिल्हयाचे नाव | तालुक्यांचे नाव |
|---|---|---|
| १ | नाशिक | नाशिक , इगतपुरी ,त्रंबक,पेठ, सिन्नर, दिंडोरी, सुरगणा, कळवण, सटाणा |
| २ | धुळे | साक्री . |
| ३ | नंदूरबार | नवापूर. |

| अ.क्र | जिल्हयाचे नाव | तालुक्यांचे नाव |
|---|---|---|
| ४ | सातारा | वाई, खटाव, कोरेगाव, खंडाळा, पाटण, सातारा, महाबळेश्वर, जावळी |
| ५ | सांगली | शिराळा. |
| ६ | कोल्हापूर | राधानगरी, करवीर, शाहूवाडी, पन्हाळा, भुदरगड, गगनबावडा, आजरा, चंदगड, गडहिंग्लज, कागल. |
| ७ | पुणे | वडगाव मावळ, भोर, वेल्हा, आंबेगाव, खेड, हवेली, मुळशी, पुरंदर, जुन्नर. |
| ८ | अहमदनगर | संगमनेर , अकोले. |

राज्यातील उर्वरीत भागात लागवडीची प्रती लाभार्थी कमीतकमी क्षेत्र मर्यादा ०.२० हेक्टर राहील. कोकण विभागाकरीता प्रती लाभार्थी लागवडीची जास्तीतजास्त क्षेत्र मर्यादा १०.०० हेक्टर राहील. कोकण विभाग वगळता राज्यातील इतर भागात प्रती लाभार्थी लागवडीची जास्तीतजास्त क्षेत्र मर्यादा ०४.०० हेक्टर राहील.

**५. योजना राबविण्याकरिता मार्गदर्शक सुचना :-**

अ) उपरोल्लेखीत अ.क्र. १ येथील दि.२७.६.२००५ च्या शासन निर्णयातील परि.६ मध्ये योजना राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना या शीर्षाखाली विविध परिशिष्टांचा/ प्रपत्रांचा उल्लेख करण्यात आला आहे. सदर परिशिष्टे / प्रपत्र यांमध्ये योग्य तो बदल करुन सन २०१५-२०१६ मध्ये रोजगार हमी योजनेशी निगडीत फळझाड लागवड कार्यक्रम राबविण्यासाठी स्वतंत्रपणे निर्गमित करण्यासाठी संचालक फलोत्पादन यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

आ) कार्यक्रमाच्या संनियंत्रणासाठी निरनिराळया स्तरावर गठित केलेल्या समित्या कायम राहतील. त्याचप्रमाणे कलमे/ रोपे यांच्या नियोजनासाठी शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक रोहयो १०९४ / प्र.क्र.६७/ फ २, दि. १३ मे, १९९४ अन्वये स्थापन केलेली समिती सन २०१५-२०१६ मध्ये कार्यरत राहील.

इ) या योजनेंतर्गत जी फळझाडे लागवडीस उपयुक्त ठरतील व जिवंत राहू शकतील अशा फळझाडांची लागवड करण्यात यावी.

ई) राज्यात सन २००८ पासून महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांकरीता फळझाड लागवड योजना घेण्यात येते. सदर योजनेतील अपात्र लाभार्थ्यांना, या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असलेल्या रोजगार हमी योजनेचा लाभ देण्यासाठी प्राथम्य देण्यात यावे.

उ) या योजनेंतर्गत फळझाडे लागवडीकरीता ठिबक सिंचनाचा वापर करण्यात यावा.

ऊ) या योजनेंतर्गत लाभ घेणा-या लाभार्थ्यांची निवड पारदर्शकपणे करण्यात यावी. त्यांची गावनिहाय यादी संपूर्ण तपशीलासह कृषि विभागाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी. तसेच त्या गावांतील लाभार्थ्यांची यादी संबंधीत ग्रामपंचायतींच्या सूचना फलकावर लावण्यात यावी.

ऋ) या योजनेतंर्गत लागवड केलेली फळझाडे जिवंत राहतील याची जबाबदारी संचालक फलोत्पादन यांनी निश्चित करावी तसेच याबाबत मासिक आढावा घ्यावा.

**६. फळझाड लागवडीसाठी मुदतः-**

वरील फळझाड लागवड योजना योग्य रीतीने राबविण्यासाठी कालबध्द कार्यक्रमाचे वेळापत्रक संचालक, फलोत्पादन यांचेमार्फत सर्व संबंधीताना वितरीत करण्यात यावे. या वेळापत्रकानुसार कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात यावी. कोकण विभागासाठी ३० सप्टेंबर, २०१५ व उर्वरीत विभागासाठी ३० नोव्हेंबर, २०१५ पर्यंत लागवड करण्यात यावी. पानपिंपरीची लागवड २८ फेब्रुवारी, २०१६ पर्यत करण्यात यावी.

७. या कार्यक्रमांतर्गत लाभ घेणा-या लाभार्थ्याच्या ७/१२ वर त्याबाबतची नोंद घेतल्याशिवाय अनुदान देण्यात येवू नये.

८. सदरहू शासन निर्णय नियोजन विभागाच्या (रोहयो) अनौपचारीक संदर्भ क्र. ८ /२०१५/ रोहयो-५, दि. १४.०८.२०१५,अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२०१७४१०८१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2015.08.20 17:48:15 +05'30'

**( प्र.शं.शेटे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा. मंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव,
३) मा.राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव,
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) सर्व कुलगुरु, ( कृषि विद्यापीठे ),
६) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७) संचालक , फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे, ( १५ जादा प्रतीसह ),
८) सर्व जिल्हाधिकारी,
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
११) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ सर्व उपविभागीय कृषि अधिकारी,

१२) सर्व जिल्हा परिषदाचे कृषि विकास अधिकारी/ सर्व तालुका कृषि अधिकारी,
१३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ /२ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) मुंबई / नागपूर.
१४) नियोजन विभाग, कार्यासन (१४३१) /(रोहयो १, ५ व ११) मंत्रालय, मुंबई,
१५) ग्राम विकास व जल संधारण विभाग, मंत्रालय,मुंबई,
१६) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग , मंत्रालय,मुंबई
१७) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, ( सामाजिक वनिकरण ) मंत्रालय, मुंबई
१८) महसूल व वन विभाग ( महसूल ) मंत्रालय, मुंबई,
१९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
२०) माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिध्दिसाठी)
२१) उपसचिव/अवरसचिव ( कृषि व फलोत्पादन ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२२) निवडनस्ती कार्यासन-९ अे.